**महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता ३६, सहायक अनुदाने (वेतन) निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : इमाव-२०२५/प्र.क्र.३७/महामंडळे**
मोती महल, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.
दिनांक : १९ मे, २०२५

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे पत्र क्र.इमाविवि/२०२५-२६/लेखा/१२९, दिनांक २८.०४.२०२५

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळास सन २०२५-२६ या वित्तीय वर्षाकरीता व्यवस्थापन व प्रशासनावरील खर्च भागविण्याकरीता (०३) (०१) सहाय्यक अनुदान (अनिवार्य) प्रधान लेखाशिर्ष २२२५ ई ८५७ अंतर्गत ३६, सहायक अनुदाने (वेतन) यासाठी रु.१०,३४,१७,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी चौतीस लक्ष सतरा हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

२. सद्य:स्थितीत सदर तरतूदीमधून बिम्स प्रणालीवर उपलब्ध रु.१,७५,८०,८९० (अक्षरी रुपये एक कोटी पंच्याहत्तर लाख ऐंशी हजार आठशे नव्वद फक्त) इतके ३६, सहायक अनुदान (वेतन) खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच, ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२) व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३) विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.

४) कार्यालयीन खर्चामध्ये काटकसर करावी.

५) महामंडळाने कर्जाच्या वसूलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.

६) सदर योजनेचा निधी हा उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.

७) उपरोक्त निधीचा खर्च करताना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.

८) संदर्भ क्र.१ येथे नमूद परिपत्रकातील प्रत्येक अटीची पूर्तता महामंडळाकडून करण्यात यावी.

९) परिपत्रकातील सूचनेनुसार वेतन अनुदान अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या बँक खात्यामध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व ऑफलाईन पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये.

३. वरील अनुदानाबाबत उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे “नियंत्रक अधिकारी” राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी लेखा अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील ४४ (अ) नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई यांस सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारे सहायक अनुदान (वेतन) हे बिनशर्त सहायक अनुदान आहे.

४. या बाबीवरील खर्च मागणी क्र. झेडजी - ३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, (०३) स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान (०३) (०१) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाला सहायक अनुदान (अनिवार्य) (२२२५ ई ८५७), ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५१९१७३५१७२८३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.05.19 17:36:02 +05'30'

**( र. रा. पेटकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या., मुंबई

३) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-३ / साउ), मंत्रालय, मुंबई.

७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.

८) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) लेखा अधिकारी (रोख शाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती (महामंडळे).